राज्य प्रशिक्षण धोरणांतर्गत
तलाठी प्रशिक्षण कार्यक्रमांच्या
खर्चासाठी निधीचे वितरण....

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग**
**शासन निर्णय क्रमांक पुरवणी-२०१८/प्र.क्र.५५२/ ई-१०**
पहिला मजला, मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२
**दिनांक :- २१ फेब्रवारी, २०१९**

**वाचा :-** (१) शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग क्र.टीआरएन-०९/प्र.क्र.३९/०९/१२-अ, दि.२३.०९.२०११
(२) शासन निर्णय, महसूल व वन विभाग क्र.तप्रशि-२०१२/प्र.क्र.२४२-अ/ई-१०, दि.२४.०३.२०१४
(३) शासन परिपत्रक्र, वित्त विभाग क्र.अर्थसं-२०१८/प्र.क्र.६९/अर्थ-३, दि.०२.०४.२०१८
(४) विभागीय आयुक्त, औरंगाबाद यांचे पत्र क्र.१८/ससंता/२०१८-१९/आठमाही/कावि-१५८, दि.१०.१२.२०१८
(५) विभागीय आयुक्त, अमरावती यांचे पत्र क्र.आकाअ/भूसु/अ.का./कावि-२१७/२०१९, दि.०१.०२.२०१९
(६) विभागीय आयुक्त, नागपूर यांचे पत्र क्र.कार्या-७(२)/इएसटी-७/सिआर-१४६/कावि-१५९८/१८/दि.१४.१२.२०१८

**प्रस्तावना :-**

शासनान राज्य प्रशिक्षण धोरणांतर्गत तलाठी पदावर प्रथम नियुक्ती देण्यापूर्वी नवनियुक्त तलाठी कर्मचाऱ्यांना सहा महिन्याचे पायाभूत प्रशिक्षण देण्याबाबत संदर्भाधिन संदर्भ क्र.२ येथील दि.२४.०३.२०१४ अन्वये निर्णय घेतला आहे. सदर प्रशिक्षण कार्यकमांतर्गत सन २०१८-१९ या कालावधीतील तलाठी कर्मचाऱ्यांना दिलेल्या प्रशिक्षण शुल्काचा निधी प्रशिक्षण केंद्राना उपलब्ध करुन देणे आवश्यक आहे. त्यानुसार सन २०१८-१९ करीता राज्य प्रशिक्षण धोरणांतर्गत मुख्यलेखाशिर्ष “२०५२ सचिवालय व सर्वसाधारण सेवा॰ ०० ००३, प्रशिक्षण (०००) (०१) शासकीय कर्मचाऱ्यांना प्रशिक्षण (२०५२ ५२०५) या योजनांतर्गत “२० इतर प्रशासकीय खर्च॰ या लेखाशिर्षाखाली रु.४ कोटी एवढा निधी वितरणासाठी उपलब्ध आहे. त्यानुषंगाने महसूल विभागातील तलाठी संवर्गातील कर्मचाऱ्यांना प्रशिक्षण देण्यासाठी विभागीय आयुक्त, औरंगाबाद यांनी संदर्भाधिन संदर्भ क्र.४ येथील दि.१०.१२.२०१८ अन्वये मराठवाडा महसूल प्रशिक्षण प्रबोधिनी, औरंगाबाद यांनी मागणी केल्यानुसार रु.३७,६८,३००/- व विभागीय आयुक्त, अमरावती यांनी संदर्भाधिन संदर्भ क्र.५ येथील दि.०१.०२.२०१९ अन्वये डॉ. पंजाबराव देशमुख विदर्भ प्रशासकीय व

विकास प्रशिक्षण प्रबोधिनी, अमरावती यांनी मागणी केल्यानुसार रु.५०,४०,०००/- तसेच विभागीय आयुक्त, नागपूर यांनी संदर्भ क्र.६ येथील दि.१४.१२.२०१८ अन्वये डॉ. पंजाबराव देशमुख विदर्भ प्रशासकीय व विकास प्रशिक्षण प्रबोधिनी, अमरावती यांनी मागणी केल्यानुसार रु.१,०८,००,०००/- एवढा निधी वितरित करण्यास विनंती केली आहे. त्याचा विचार करता "राज्य प्रशिक्षण धोरणांतर्गत प्रशिक्षण (२०५२ ५२०५) या योजनेखाली निधी वितरित करण्याची बाब शासनाच्या विचाराधिन होती.

**शासन निर्णय :-**

महसूल विभागातील तलाठी संवर्गातील कर्मचाऱ्यांना प्रशिक्षण देण्यासाठी खालील तक्त्यात नमूद केलेल्या प्रशिक्षण संस्थाना प्रशिक्षण कार्यक्रमासाठी झालेल्या खर्चाकरीता एकूण रक्कम **रु.१,९६,०८,३००/-** ( रुपये एक कोटी शहाण्णव लाख आठ हजार तिनशे फक्त) इतका निधी वितरीत करण्यास शासन मंजूरी देण्यात येत आहे.

| अ.क्र. | विभाग | प्रशिक्षण संस्था | आवश्यक रक्कम (रुपयात) | वितरणासाठी प्रस्तावित निधी |
|---|---|---|---|---|
| १ | **औरंगाबाद विभाग** | मराठवाडा महसूल प्रशिक्षण प्रबोधिनी, औरंगाबाद | रु.३७,६८,३००/- | रु.३७,६८,३००/- |
| २ | **अमरावती विभाग** | डॉ. पंजाबराव देशमुख विदर्भ प्रशासकीय व विकास प्रशिक्षण प्रबोधिनी, अमरावती | रु.५०,४०,०००/- | रु.५०,४०,०००/- |
| ३ | **नागपूर विभाग** | डॉ. पंजाबराव देशमुख विदर्भ प्रशासकीय व विकास प्रशिक्षण प्रबोधिनी, अमरावती | रु.१,०८,००,०००/- | रु.१,०८,००,०००/- |
| | | **एकूण** | **रु.१,९६,०८,३००/-** | **रु.१,९६,०८,३००/-** |

२. सदर खर्च विभागीय आयुक्त, औरंगाबाद / अमरावती व नागपूर विभाग यांनी मागणी क्र.सी-४, मुख्यलेखाशिर्ष “२०५२ सचिवालय व सर्वसाधारण सेवा॰ ०० ००३, प्रशिक्षण (०००) (०१) शासकीय कर्मचाऱ्यांना प्रशिक्षण (२०५२ ५२०५) (दत्तमत) या योजनांतर्गत “२० इतर प्रशासकीय खर्च॰ या उद्दीष्टामधून सन २०१८-१९ या आर्थिक वर्षासाठी मंजूर झालेल्या तरतूदीमधून भागविण्यात यावा.

३. मंजूर करण्यात आलेल्या अनुदानाची संबंधित कोषागारातून काढलेली रक्कम, महालेखापाल कार्यालयातील लेख्यात त्याच शिर्षाखाली नोंदली गेली आहे किंवा नाही याची खात्री संबंधितांनी करुन घ्यावी व त्याबाबतचे प्रमाणपत्र शासनास सादर करावे.

४. संस्थेने वितरित करण्यात येत असलेल्या अनुदानाचे विनियोग प्रमाणपत्र महालेखापाल, लेखापरीक्षा महाराष्ट्र १/२ व शासनास तातडीने सादर करावे.

५. सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या संदर्भ क्र.३ येथील दि.०२.०४.२०१८ अन्वये प्रशासकीय विभागांना प्रदान करण्यात आलेल्या अधिकारान्वये निर्गमित करण्यात येत आहे.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेताक २०१९०२२११७२५१८८०१९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्र राज्यपाल यांचे आदेशानुसार व नावाने,

Santosh Haridasrao Bhogle

Digitally signed by Santosh Haridasrao Bhogle
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Revenue And Forest Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=cfe36679ae12922422bc5e7f7d277841f1fe67725f465c272fd6727259260b3d, cn=Santosh Haridasrao Bhogle
Date: 2019.02.21 17:27:45 +05'30'

**(डॉ. संतोष भोगले)**
**सह सचिव**

**प्रत,**

१. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता / लेखा परीक्षा) महाराष्ट्र १, मुंबई
२. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता / लेखा परीक्षा) महाराष्ट्र २, नागपूर
३. अपर मुख्य सचिव (वित्त), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
४. अपर मुख्य सचिव (सेवा), सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई.
५. विभागीय आयुक्त, कोंकण
६. विभागीय आयुक्त, पुणे
७. विभागीय आयुक्त, नाशिक
८. विभागीय आयुक्त, औरंगाबाद
९. विभागीय आयुक्त, अमरावती
१०. विभागीय आयुक्त, नागपूर
११. महासंचालक, मराठवाडा महसूल प्रशिक्षण प्रबोधिनी, औरंगाबाद
१२. महासंचालक, डॉ. पंजाबराव देशमुख विदर्भ प्रशासकीय व विकास प्रशिक्षण प्रबोधिनी, अमरावती
१३. महासंचालक, विभागीय तलाठी प्रशिक्षण केंद्र, चंद्रपूर
१४. सह सचिव, वित्त विभाग (अर्थ-३), मंत्रालय, मुंबई.
१५. कक्ष अधिकारी, (ब-१ / ब-२ / ई-१३अ ) महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई.
१६. निवडनस्ती (कार्यासन ई-१०), महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई.